**जिल्हा हिवताप अधिकारी पालघर यांचे कार्यालयातील नवनिर्मित १० अस्थाई पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पदआ - २०१९ /प्र.क्र. ९४/आरोग्य-५**
१० वा मजला, संकुल इमारत,
गो.ते.रुग्णालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: ३० सप्टेंबर, २०२०

वाचा -

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक -पदनि २०१८/प्र.क्र.४० (भाग-२) /आरोग्य -३, दिनांक- २३.०५.२०१८.
२) शासन निर्णय क्र. पदआ-२०१९/प्र.क्र.९४/आरोग्य-५, दिनांक २२.०६.२०२०.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दिनांक ३१.०८.२०२०
४) सहसंचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), मुंबई यांचे पत्र क्रमांक-आआसे/हिनिका/जिहिका पालघर/१०/अपदे/चालु ठेवणेस/मंजूर/कक्ष्ज्ञ-१८/११७-११९/२०२० दिनांक २६.०५.२०२०.

**शासन निर्णय-**

उपरोक्त अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये पालघर येथे जिल्हा हिवताप अधिकारी कार्यालय स्थापन करण्यात आले आहे. सदर कार्यालयासाठी नियमीत १० पदांची निर्मिती करण्यात आलेली आहे.

२. संदर्भाधीन २ च्या शासन निर्णयान्वये जिल्हा हिवताप अधिकारी, पालघर कार्यालय, येथील नव्याने निर्मित केलेल्या १० अस्थायी पदांना दिनांक ३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. सदर मुदतवाढ दिनांक ३१.०८.२०२० रोजी संपुष्टात आली असून, उपरोक्त संदर्भाधीन ३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागाना प्रदान केलेल्या अधिकारानुसार जिल्हा हिवताप अधिकारी, पालघर कार्यालयातील नव्याने निर्मित १० अस्थायी पदांना दिनांक ०१.०९.२०२० ते दिनांक २८.०२.२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०२०-२०२१ या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**<u>मागणी क्रमांक-आर-१</u>**
२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
१०१ - रोग प्रतिबंध व रोग नियंत्रण
०१-०५ - हिवताप रोग नियंत्रण कार्यक्रम
(२२१०० ६११)

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९०८११३४५५४२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KIRAN VASANTRAO WAHUL

Digitally signed by KIRAN VASANTRAO WAHUL
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=58e32592d7ee16b3f0ea3e5db304272db056899514ece7f762990f9b1a0c5049,
postalCode=400001,
street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=2e35734ec976bf5657815fb42c4d25b0b3c23b4c69600638f3deb172ac9e37f4, ou=PHD,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KIRAN VASANTRAO WAHUL
Date: 2020.10.01 14:20:57 +05'30'

**(किरण वाहुल)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई नागपूर
२) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४) सहसंचालक,आरोग्य सेवा (रुग्णालये- राज्यस्तर), मुंबई.
५) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) मुंबई.
६) सहसंचालक आरोग्य सेवा (कुष्ठ व क्षय) पुणे.
७) उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे
८) जिल्हा शल्य चिकित्सक,जिल्हा रुग्णालय, पालघर
९) जिल्हा हिवताप अधिकारी, पालघर.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर.
११) वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१२) कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/ सेवा-५/अर्थसंकल्प, सा.आ.वि. मंत्रालय,मुंबई.
१३) निवडनस्ती (आरोग्य-५)